**शैक्षणिक वर्ष २०१३-१४ व २०१४-१५ मधील व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या ज्या नवीन संस्थांना / नवीन अभ्यासक्रमांना / अभ्यासक्रमांतील प्रवेशक्षमता वाढीला बृहत आराखडयानुसार नकारात्मक शिफारशी असल्यामुळे शिक्षण शुल्क प्रतिपूर्तीची योजना लागू राहणार नाही, ही अट मान्यतेच्या आदेशातून रद्द करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.सीटीसी-२०१४/प्र.क्र.२३४ /तांशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २४ जून, २०१५.

**प्रस्तावना :**

शैक्षणिक वर्ष २०१३-१४ व २०१४-१५ मधील व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या ज्या नवीन संस्थांना / नवीन अभ्यासक्रमांना / अभ्यासक्रमातील प्रवेशक्षमता वाढीस बृहत आराखडा विचारात घेऊन नकारात्मक शिफारशी करण्यात आल्या आहेत किंवा ज्या संस्थांनी थेट अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांच्याकडे अर्ज केला आहे, अशा संस्थांना / अभ्यासक्रमांना / प्रवेशक्षमता वाढीला शासनाची मान्यता देतांना अशा संस्थांमध्ये / अभ्यासक्रमांमध्ये प्रवेश घेणा-या सामाजिक मागास प्रवर्गातील व आर्थिकदृष्टया मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना शिक्षण शुल्क प्रतिपूर्तीची योजना लागू राहणार नाही अशी अट मान्यतेच्या शासन निर्णयांमध्ये अट क्र.१४ अंतर्भूत करण्यात आली होती.

२. या अटी विरुध्द दि असोसिएशन ऑफ मॅनेजमेंटस् ऑफ अन-एडेड इंजिनिअरींग कॉलेजेसआणि इतर काही संस्थांनी मा.उच्च न्यायालयात रिट याचिका दाखल केल्या होत्या. त्यावर मा.उच्च न्यायालयाने दिनांक ९/९/२०१४ व २९/१/२०१५ रोजी याचिकाकर्त्यांच्या बाजूने निकाल देवून वरील अट रद्द करुन सामाजिक मागास प्रवर्गातील व आर्थिकदृष्टया मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना शिक्षण शुल्क प्रतिपूर्तीची योजना लागू करण्याचे आदेश मा.उच्च न्यायालयाने दिले आहेत.

३. मा.उच्च न्यायालयाच्या सदर आदेशास अनुसरुन वरील अट रद्द करुन उपरोक्त संस्थांमधील सामाजिक मागास प्रवर्गातील व आर्थिकदृष्टया मागास प्रवर्गातील पात्र विद्यार्थ्यांना शिक्षण शुल्क प्रतिपूर्तीची योजना लागू करणे व त्या अनुषंगाने वरील अट रद्द करण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

शैक्षणिक वर्ष २०१३-१४ व २०१४-१५ मधील व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या ज्या नवीन संस्थांना / नवीन अभ्यासक्रमांना / अभ्यासक्रमातील प्रवेशक्षमता वाढीस बृहत आराखडा विचारात घेऊन नकारात्मक शिफारस करण्यात आल्या आहेत किंवा ज्या संस्थांनी थेट अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांच्याकडे अर्ज केला आहे अशा संस्थांना / अभ्यासक्रमांना / प्रवेशक्षमता वाढीला शासनाची मान्यता देतांना खालील अट मान्यतेच्या शासन निर्णयांमध्ये अंतर्भूत करण्यात आली होती :

"या शासन निर्णयाव्दारे ज्या नवीन संस्थांना / अभ्यासक्रमांना अथवा अभ्यासक्रमातील प्रवेशक्षमता वाढीला मान्यता देण्यात आली आहे, अशा ज्या संस्थांनी अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेकडे किंवा वास्तुकला परिषदेकडे राज्य शासनामार्फत प्रस्ताव सादर न करता थेट प्रस्ताव सादर केले आहेत व ज्यांना राज्य शासनाची नकारात्मक शिफारस आहे, अशा संस्थांना / अभ्यासक्रमांना / प्रवेशक्षमता वाढीला राज्य शासनामार्फत राबविण्यात येणारी फी-प्रतिपूर्तीची योजना लागू राहणार नाही. या अटीनुसार संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी."

२. वरील अट ज्या शासन निर्णयांमध्ये नमूद केली आहे त्या सर्व शासन निर्णयामधून ती अट सदरच्या शासन निर्णयाव्दारे रद्द करण्यात येत आहे. त्यानुसार संबंधीत संस्थांमधील व्यावसायिक अभ्यासक्रमात शैक्षणिक वर्ष २०१३-१४ व २०१४-१५ मध्ये शासनाच्या केंद्रीभूत प्रवेश पध्दतीने प्रवेश घेतलेल्या सामाजिक मागास प्रवर्गातील व आर्थिक मागास प्रवर्गातील पात्र विद्यार्थ्यांना राज्य शासनामार्फत राबविण्यात येणारी शिक्षण शुल्क प्रतिपूर्तीची योजना लागू राहील.

३. अशा शैक्षणिक संस्थांमध्ये शैक्षणिक वर्ष २०१३-१४ व २०१४-१५ करीता प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांपैकी जे विद्यार्थी राज्य शासनाच्या शिक्षण शुल्क प्रतिपूर्ती योजनेंतर्गत पात्र ठरतात, त्या लाभार्थी विद्यार्थ्यांकडून जर संबंधीत शैक्षणिक संस्थेने शिक्षण शुल्कापोटी शुल्क घेतले असल्यास सदरचे आकारलेले शिक्षण शुल्क संबंधीत विद्यार्थ्यांना विना अट परत करण्याची कार्यवाही विनाविलंब करावी.

४. सदर शासन निर्णय विधी व न्याय विभाग आणि वित्त विभाग यांच्या सहमतीने वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.३६३/व्यय-५, दिनांक ९/६/२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१५०६२४१७३२१०५१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Madan Maruti Morve

Digitally signed by Madan Maruti Morve
DN: CN = Madan Maruti Morve, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.06.24 17:33:57 +05'30'

**(म.मा.मोरवे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. अतिरिक्त मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२. अतिरिक्त मुख्य सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
४. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई

६. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. सर्व सहसंचालक, तंत्रशिक्षण, विभागीय कार्यालये (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
८. अवर सचिव (तांशि-३ / तांशि-५), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
९. अध्यक्ष, असोसिएशन ऑफ दि मॅनेजमेंटस् ऑफ अन-एडेड इंजिनिअरींग कॉलेजेस् (महाराष्ट्र), व्दारा : के.के.वाघ एज्युकेशन सोसायटी, अमृतधाम, पंचवटी, नाशिक - ४२२ ००३
१०. सर्व संबंधित संस्था (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
११. अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली - ११० ००१.
१२. सहायक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण विभाग), नवी दिल्ली.
१३. विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डींग, २ रा मजला, चर्चगेट, मुंबई.
१४. निवड नस्ती-तांशि-४